**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) विनायक शामराव काळे, सह. शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.९६/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ४ मार्च, २०२४

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/७८४०/२०२३ दिनांक ०१/११/२०२३.

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) कै. (श्री.) विनायक शामराव काळे, सह. शिक्षक यांना जि.प.प्रा. शाळा, काळेवाडी केंद्र-भराडी ता. सिल्लोड जि. औरंगाबाद यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०४/०५/२०२२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) विनायक शामराव काळे, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. औरंगाबद यांनी कै.श्री. काळे यांच्या वारसास कोव्हिड-१९ विमा कवच/सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत शिफारस केली आहे.

३. कै.(श्री.) काळे यांची तहसिलदार, तहसिल कार्यालय सिल्लोड, जि. औरंगाबाद यांच्या दि.१८/०३/२०२१ रोजीच्या आदेशान्वये कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव व प्रसार टाळण्याच्या दृष्टीने नियुक्ती करण्यात आली होती.

४. कै. (श्री.) काळे यांना उपरोक्त तहसिलदार, तहसिल कार्यालय सिल्लोड, जि. औरंगाबाद यांच्या दि.१८/०३/२०२१ च्या आदेशावरुन कोव्हिड-१९ संबंधी सर्वेक्षणाचे कामकाज करण्यासाठी मुख्याध्यापक, जि.प.प्रा. शाळा, काळेवाडी केंद्र-भराडी ता.सिल्लोड जि.औरंगाबाद यांनी दि.१८/०३/२०२१ रोजी कार्यमुक्त केले आहे.

५. कै.(श्री.) काळे यांची कोव्हिड-१९ महामारी प्रतिबंध कुटुंब सर्वेक्षण करण्यासाठी दिनांक १८/०३/२०२१ च्या आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. दरम्यान संबंधितास दिनांक १२/०४/२०२१ रोजी कोरोनाची लागण झाली व दिनांक ०४/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ मुळे निधन झाले. इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर असल्याबाबत तहसिलदार, सिल्लोड जि.औरंगाबाद यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) काळे यांना दि. १४/०४/२०२१ ते दि. ४/०५/२०२१ या कालावधीत हेडगेवार हॉस्पीटल, गारखेडा परिसर, औरंगबाद येथे कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. दि.०४/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय अधिक्षक, हेगडेवार हॉस्पीटल, गारखेडा परिसर, औरंगाबाद यांनी दिलेल्या वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे दिसून येते.

७. कै. (श्री.) काळे यांचा दिनांक ०४/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र निबंधक, जन्म आणि मृत्यु, महानगरपालिका, औरंगाबाद यांचे दि.२६/०८/२०२१ रोजीचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

८. मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, सिल्लोड, जि. औरंगाबाद यांनी कै. (श्री.) काळे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती कांताबाई विनायक काळे (पत्नी), (२) श्री.विकास विनायक काळे (मुलगा) व (३) श्रीमती मनिषा ईश्वर सरोदे (मुलगी) यांना दिनांक ०९/०९/२०२१ च्या न्यायनिर्णयान्वये घोषित केले आहे.

९. तहसिलदार, सिल्लोड जि.औरंगाबाद, वैद्यकीय अधिक्षक, हेगडेवार हॉस्पीटल, गारखेडा परिसर, औरंगाबाद यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, सिल्लोड यांनी वारस घोषित केल्यानुसार कै. (श्री.) काळे यांचे कायदेशीर वारस म्हणून (१) श्रीमती कांताबाई विनायक काळे (पत्नी), (२) श्री.विकास विनायक काळे (मुलगा) व (३) श्रीमती मनिषा ईश्वर सरोदे (मुलगी) यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१०. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/२०२२/व्यय ९, दिनांक ०५/१२/२०२२ अन्वये खालील नमूद लेखाशीर्षाखाली आर्थिक वर्ष २०२४-२०२५ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> “मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर.”

११. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०३०४१७५९२१०२२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.04 18:08:33 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), औरंगाबाद

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ९६/२०२३)